**राज्यातील विविध पाटबंधारे विकास महामंडळांकडून उपलब्ध होणाऱ्या निधीमधून ठिबक व तुषार सिंचन प्रकल्प/योजना राबविण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय, क्रमांक:एसडीआय/१६९९/सीआर१२५/भाग-२/४-अे
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२,
**दिनांक २१ मार्च,२०००**

वाचा :- १) शासन निर्णय, कृषी व पदुम विभाग, क्रमांक:एसडीआय-१६९९/सीआर-३७/४-ए, दिनांक ६ मे १९९९
२) शासन निर्णय, कृषी व पदुम विभाग, क्रमांक:एसडीआय-१६९८/सीआर-६१/४-ए, दिनांक ८ जुलै १९९९.
३) शासन पत्र, पाटबंधारे विभाग, क्रमांक:एसडीआय/१६९९/सीआर-१२५/भाग-२/४-ए/जसंनि, दि. १५.३.२०००

प्रस्तावना :-

शेतकऱ्यांना अनुदान तत्वावर ठिबक सिंचन संच वाटप करण्यासाठी राज्य पुरस्कृत व केंद्र पुरस्कृत ठिबक सिंचन योजना राज्यात राबविण्यात येत आहेत. याशिवाय, पाटबंधारे विकास महामंडळांच्या निधीमधून ठिबक व तुषार सिंचनाच्या प्रकल्प/योजनां करिता संबंधित महामंडळांनी उपलब्धतेनुसार निधी कृषी विभागास द्यावा, असा निर्णय शासनाने तत्वत: घेतला आहे. तसेच विदर्भातील ठिबक सिंचन योजनेकरिता निधी उपलब्ध होण्याच्या दृष्टीने १९९९-२००० पासून पुढील ५ वर्षांत प्रतिवर्षी रु. २५.०० कोटी याप्रमाणे एकुण रु. १२५.०० कोटी निधी ठिबक व तुषार सिंचन योजनेसाठी विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाकडून उपलब्ध करुन देण्यास शासनाने तत्वत: मान्यता देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे गोदावरी पाटबंधारे विकास महामंडळ व कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या निधीमधून मराठवाडयात रु.५०.६४ कोटी खर्च करुन २५,००० हे. क्षेत्रावर ठिबक सिंचन योजना व रु. २२.२६कोटी खर्च करुन

200201221302400000-0400

१५,०००हेक्टरवर तुषार सिंचन योजना मार्च,२००५ पर्यन्त राबविण्यास शासनाने तत्वत: मान्यता दिली आहे. तसेच विविध पाटबंधारे विकास महामंडळांकडूनही ठिबक व तुषार सिंचन प्रकल्प/योजनेकरिता कृषी विभागास देण्यात येणाऱ्या निधींचा विनियोग करण्याबाबतची कार्यपध्दती व मार्गदर्शक सूचना विहित करण्यास कृषी विभागास प्राधिकृत करण्यात आले आहे.

त्यानुसार विविध सिंचन विकास महामडळांकडून ठिबक व तुषार प्रकल्पासाठी निधी मुक्त करण्याबाबत पाटबंधारे विभागाने त्यांच्या दिनांक १५ मार्च, २००० च्या पत्रानुसार सूचना देण्यात आलेल्या आहेत. राज्यातील विविध सिंचन विकास महामंडळाकडून ठिबक व तुषार सिंचन प्रकल्पासाठी कृषी विभागास उपलब्ध होणाऱ्या निधीच्या वापराबाबतच्या प्रकल्प/योजनेस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>**शासन निर्णय**</u> :- राज्यातील विविध सिंचन विकास महामंडळाच्या निधी वितरणा संदर्भात वित्त विभागाने मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षेखाली गठित केलेल्या उच्चाधिकार समितीने दि. २ जुलै १९९९ रोजी झालेल्या बैठकीत ठिबक सिंचन प्रकल्पांकरिता रु. ६५.०० कोटी ( रुपये पासष्ट कोटी फक्त ) निधी सन १९९९-२००० मध्ये मंजूर करण्यास मान्यता दिली. त्यास अनुसरुन रुपये ६५.०० कोटी निधीच्या मर्यादेत सन १९९९-२००० मध्ये तुषार/ठिबक सिंचन प्रकल्प/योजना राबविण्यास शासन मान्यता देत आहे. मात्र हा निधी पाटबंधारे सिंचन विकास महामंडळाकडून दर वर्षी याप्रमाणे पुढील ५ वर्षात नियमितपणे उपलब्ध होणार असल्यामुळे सिंचन विकास महामंडळाकडून मुक्त होणाऱ्या निधीच्या मर्यादेत हा कार्यक्रम राबविण्यात यावा. कृषि विभागास प्राप्त होणा-या

GR - 200201221302400000-040

निधीचा सिंचन विकास महामंडळ निहाय तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | पाटबंधारे विकास महामंडळाचे नाव | सन १९९९-२००० मध्ये उपलब्ध करुन द्यावयाचा निधी ( रुपये कोटीत ) |
|---|---|---|
| १) | विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ | २५.०० |
| २) | तापी पाटबंधारे विकास महामंडळ | २०.०० |
| ३) | गोदावरी मराठवाडा विकास महामंडळ | १५.०० |
| ४) | कोकण पाटबंधारे विकास महामंडळ | ०५.०० |
| | **एकूण** | **६५.००** |

२. तुषार व ठिबक सिंचन योजना/प्रकल्पासाठी सन १९९९-२००० पासून राज्यातील विविध पाटबंधारे विकास महामंडळाकडून प्राप्त होणाऱ्या निधीकरिता **निधी वितरण अभिकरण** म्हणून महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांना प्राधिकृत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. या प्रकल्पासाठी उपलब्ध होणाऱ्या निधीचा विनियोग करण्याची कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहिल.

२.१ पाटबंधारे विभागाच्या अखत्यारीतील पाटबंधारे विकास महामंडळांनी कृषी विभागास निधी उपलब्ध करुन द्यावा. हा निधी कृषी विभागाकरिता, त्या विभागाच्या अखत्यारितील महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांच्या नावे अभिहस्तांकित करण्यात यावा. महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांनी पाटबंधारे विकास महामंडळाकडून प्राप्त होणाऱ्या निधीचे **निधी वितरण अभिकरण** म्हणून काम पहावे. मात्र **त्यासाठी महामंडळाला कोणतेही शुल्क देय राहणार नाही.**

२.२ सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी यांनी, त्यांच्या जिल्ह्यात तुषार व ठिबक सिंचन योजनांकरीता आवश्यक असलेल्या एकूण निधीच्या मागणीचा प्रस्ताव कृषी आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना तात्काळ सादर करावा. जिल्ह्यांच्या निधीच्या मागणीनुसार पाटबंधारे

महामंडळ निहाय एकत्रित प्रस्ताव कृषी आयुक्तांनी तयार करावा आणि जिल्हानिहाय निधी वितरणाचा अंतिम प्रस्ताव कृषी आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांची मान्यता देवून महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांचेकडे पाठवावा. कृषी आयुक्तांच्या प्रस्तावानुसार पाटबंधारे विकास महामंडळनिहाय/ जिल्हानिहाय निधी वितरण महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांनी करावे.

२.३ महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाने निधीचे जिल्हानिहाय वितरण ज्या-त्या जिल्ह्याचे अधीक्षक, कृषी अधिकारी यांचेमार्फत संबंधितांना कृषी विभागाच्या प्रचलित मार्गदर्शक सूचना आणि नियम यानुसार करावे. याबाबत महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ यांनी काही अडचण/शंका असल्यास त्यांनी तात्काळ त्याबाबत शासनाचे मार्गदर्शन/आदेश घ्यावेत. **कृषी आयुक्तालयाकडून महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाकडे अंतिम प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून एका आठवड्याच्या कालावधीत संबंधीताना निधीचे वाटप महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाने करावे.**

२.४ महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाने निधी वितरणाचा मासिक अहवाल कृषी आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करावा आणि निधीच्या उपयोगितेचे प्रमाणपत्र कृषी विभागामार्फत संबंधित पाटबंधारे विकास महामंडळांना सादर करावे.

२.५ महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित मुंबई यांनी उपलब्ध होणा-या निधीवर खर्चाचे स्वतंत्र लेखे तयार करुन स्वतंत्रपणे हिशेब ठेवण्यात यावा, त्याचप्रमाणे जमा होत असलेल्या रक्कमेवर व्याज (मिळाल्यास) ते सुध्दा या निधीमध्ये समाविष्ठ करावेत.

३. ठिबक सिंचन संचासाठी किंमतीच्या **५० टक्के** अथवा कमाल **रु. २०५००/-** (रुपये वीस हजार पाचशे फक्त) इतके अनुदान प्रतिहेक्टरी प्रतिवर्षी **२** हेक्टर मर्यादेपर्यन्त आणि तुषार सिंचन संचासाठी किंमतीच्या **५० टक्के** वा कमाल **रु.१२०००/-** ( रुपये बारा हजार फक्त ) प्रतिहेक्टरी अनुदान देय राहील. हा अनुदानाचा दर सर्व सिंचन विकास महामंडळाकडून प्राप्त होणाऱ्या निधीकरिता समान राहील. सदरच्या अनुदानाचा दर अद्याप पर्यन्त ज्या प्रकरणांना अनुदान देण्यात आलेले नाही अशा सर्व प्रकरणांना अनुज्ञेय राहील.

४. विदर्भ, तापी, गोदावरी-मराठवाडा व कोकण पाटबंधारे विकास महामंडळां-कडून उपलब्ध होणाऱ्या निधीतून प्रचलित राज्य पुरस्कृत ठिबक सिंचन व तुषार सिंचन योजनेत ऊस,कापूस या पिकांसह सर्व फळपिकांचा समावेश करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. याकरिता प्रतिवर्षी प्रतिलाभार्थी २ हेक्टरची क्षेत्र मर्यादा राहील. ज्या ठिकाणी पिण्याचे पाणी उद्योगधंद्यांना उपलब्ध करुन दिले जाते, त्या क्षेत्रात कालव्याच्या शेवटी मिळणाऱ्या पाण्याचे प्रमाण कमी होत असल्याने अशा क्षेत्रांना या योजने अंतर्गत प्राधान्य देण्यात यावे.

५. ठिबक व तुषार सिंचन योजना/प्रकल्प राबविण्याकरिता आयुक्त (कृषी) यांनी ठिबक व तुषार सिंचन संचाचे हमी कालावधी (गॅरन्टी) याचा समावेश करुन विहित असलेल्या सविस्तर मार्गदर्शक सूचना तात्काळ निर्गमित कराव्यात.

६. हा शासन निर्णय, पाटबंधारे, नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक **१५०/२०००,सा.ऊ., दि. ७.३.२०००**

UR - 200201221302400000-0400

अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( रा. तु. जाधव )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन,
कृषी व पदुम विभाग.

प्रति,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. मंत्री (कृषी व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री (पाटबंधारे) यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री (फलोत्पादन, कृष्णा व कोकण सिंचन विकास महामंडळे) यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,
मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव,
सचिव (पाटबंधारे), मंत्रालय, मुंबई-३२,
आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य,पुणे.
व्यवस्थापकीय संचालक, म.कृ.उ.वि.म.मर्या. राजन हॉऊस प्रभादेवी, मुंबई-४०० ०२५ (१० प्रतीसह)
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे,
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर,
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
सर्व विभागीय कृषी सहसंचालक
सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी,
कक्ष अधिकारी ( का-१४३१ ), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
कक्ष अधिकारी (जसंनि), पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई,
कक्ष अधिकारी (व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

GR- 200201221302400000-0400